**कुंभार समाजाच्या व्यक्तींना शासनाने दिलेल्या सवलतीचा लाभ मिळणेस सुलभता यावी याकामी तहसिल पातळीवर वाहतूकीची परवानगी देण्याच्या कार्यपध्दतीबाबत निर्देश देणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः गौखनि /०८१८/प्र.क्र.१९५/ख**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: २१/०१/२०१९

वाचा :-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक गौखनि १०/०५१०/प्र.क्र. २१५/ख, दि ०३/११/२०१०.

२) शासन अधिसूचना, महसूल व वन विभाग, क्रमांक गौखनि ४५/०२०८/प्र.क्र.३८/ख, दि. २१/०७/२०१४.

**-: शासन परिपत्रक :-**

शासनाने कुंभार समाजाच्या व्यक्तींना विटा, कौले किंवा इतर वस्तू तयार करण्यास दरवर्षी ५०० ब्रासपर्यंत मातीसाठी स्वामित्वधन माफ केलेले आहे. तरीही कुंभार समाजाच्या व्यक्तीकडे स्वामित्वधन भरण्यासाठी क्षेत्रिय अधिकाऱ्याकडून आग्रह धरला जातो अशा अनेक तक्रारी शासनास प्राप्त होत आहेत. अखिल महाराष्ट्र कुंभार समाज संघटनेतील पदाधिकाऱ्यांनी तहसिल पातळीवर कुंभार समाजातील व्यक्तींना माती वाहतूक परवाना देण्याची वेगवेगळी पध्दत असल्याने त्यासाठी वेगवेगळ्या कागदपत्रांची मागणी केली जात असून त्याचा कुंभार समाजातील व्यक्तींना त्रास होत असल्याने, कोल्हापूर जिल्हयातील तालूका पन्हाळा येथे कुंभार समाजाकरीता स्वामित्वधनाशिवाय माती उत्खननास परवाना देताना राबविण्यात आलेल्या कार्यपध्दतीप्रमाणे कार्यपध्दती संपूर्ण राज्यात राबविण्यात यावी अशी विनंती शासनास केलेली आहे. त्यानुषंगाने राज्यामध्ये कुंभार समाजातील व्यक्तींना वरील वाचा येथील अ.क्र. २ मध्ये नमूद तरतुदीचा लाभ देण्याच्या दृष्टीने माती वाहतूक परवाने निर्गत करण्याच्या पध्दतीत सुसुत्रता यावी याकरीता तहसिल पातळीवर अशी परवानगी देण्याची सर्वसाधारण कार्यपध्दती कशी असावी या बाबत खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत :-

१) प्रत्येक तहसीलदाराने तलाठी व मंडळ अधिकारी यांचे मार्फत सर्वेक्षण करून परंपरागत कुंभार व्यवसाय करणाऱ्या कुंभार समाजातील व्यक्तींची गावनिहाय यादी तयार करावी. सदर यादी तयार करताना जातीचे दाखले असलेल्या व्यक्तींची व जातीचे दाखले नसलेल्या व्यक्तींची स्वतंत्र यादी तयार करावी.

२) तालुक्यातील पिढीजात व्यवसाय करणाऱ्या कुंभार समाजातील ज्या व्यक्तींकडे जातीचे दाखले नाहीत अशा व्यक्तींना जातीचे दाखले देण्यासाठी तालुका स्तरावर

स्वतंत्र शिबिर आयोजीत करून अशा व्यक्तींकडून जातीचे दाखले मिळण्याबाबतचे परिपुर्ण प्रस्ताव प्राप्त करून घ्यावेत. तद्नंतर संबंधितांना नियमानुसार, पुराव्याच्या कागदपत्रांची खात्री करून सक्षम प्राधिकाऱ्याकडून जातीचे दाखले देण्याची व्यवस्था करावी. याबाबत संबंधित उपविभागीय अधिकारी यांनी पुढाकार घ्यावा.

३) महाराष्ट्र शासन अधिसूचना क्रमांक गौखनि ४५/०२०८/प्र.क्र.३८/ख, दिनांक २१/०७/२०१४ मध्ये नमूद केलेले ओळखपत्र पारंपारीक व्यवसाय करणाऱ्या कुंभार समाजाच्या सज्ञान व्यक्तीस मिळणेसाठी अशा व्यक्तीने अर्जासोबत जातीचा दाखला, व तलाठी/मंडळ अधिकारी यांचा सदर व्यक्ती पारंपारिक कुंभार समाजाचा व्यवसाय करत असल्याचा अहवाल हे कागदपत्र तहसिल कार्यालयास सादर केल्यास सदरचे ओळखपत्र संबंधित व्यक्तीला सात दिवसांच्या आत वितरीत करण्याची कार्यवाही संबंधित तहसीलदार यांनी करावी. आवश्यकतेनुसार त्यासाठी तालुका स्तरावर शिबीराचे आयोजन करावे.

४) कुंभार समाजातील व्यक्तींना पारंपारीक व्यवसायासाठी ज्या ज्या जमिनीतून माती उपलब्ध होऊ शकते अशा संभाव्य जमीनींची माहिती तालुक्यातील कुंभार व्यवसाय करणाऱ्या व्यक्तींकडून प्राप्त करून घेऊन सदर जमिनींचा जिल्हा गौण खनिज आराखड्यामध्ये समावेश करण्यासाठी संबंधित तहलिसदार यांनी जिल्हाधिकारी कार्यालयाकडे प्रस्ताव सादर करावेत. सदर प्रस्तावांची जिल्हास्तरीय समितीने छाननी करून सदर जमिनींचा खनिज आराखड्यामध्ये समावेश करण्याबाबत नियमानुसार योग्य निर्णय घ्यावा.

५) कुंभार समाजातील व्यक्तीने पारंपारीक व्यवसायासाठी माती उत्खनन व वाहतूकीचा परवाना मागणी करणारा अर्ज व त्यासोबत जातीचा दाखला, कुंभार समाजाचे ओळखपत्र, व ज्या ठिकाणावरून माती उत्खनन करावयाचे आहे त्या ठिकाणचा तलाठी/ मंडळ अधिकारी यांनी केलेला पंचनामा, जमीन मालकाचे संमतीपत्र इ. कागदपत्रे जोडून अर्ज केल्यास त्यांच्याकडून अर्ज फी व स्वामित्वधन न आकारता अस्तीत्वातील खनिज आराखडा विचारात घेवून नियमानुसार परवाने देण्याची कार्यवाही सात दिवसांत पुर्ण करावी.

६) कुंभार समाजातील व्यक्तींना पारंपारीक व्यवसायासाठी माती उत्खनन व वाहतूक परवाना देताना एका वर्षामध्ये ५०० ब्रासपर्यंत स्वामित्वधन माफ असल्याने कुंभार समाजातील व्यक्तींच्या मागणीप्रमाणे सदर मर्यादेपर्यंत परवाने द्यावेत.

७) परवान्याची मुदत ठरवताना वापरण्यात येणारी वाहनांची संख्या वाहनांचा प्रकार, वाहनाची क्षमता तसेच वाहतुकीचे अंतर याचा विचार करून मुदत ठरविण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०१२२१३३१०७३२१९ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, serialNumber=aa3985b8c1804418574f1872e9908934b35fbd2a705aaf56c57fbd437a59270d, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2019.01.22 13:34:13 +05'30'

(राजेंद्र क्षीरसागर)
शासनाचे सह सचिव

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन मलबार हिल मुंबई. (पत्रान्वये)
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (महसूल) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा. राज्यमंत्री (महसूल) महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई.
७) प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर.
८) सर्व विभागीय आयुक्त.
९) सर्व जिल्हाधिकारी.
१०) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
११) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व उपविभागीय अधिकारी.
१३) सर्व तहसिलदार.
१४) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई.
१५) महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), नागपूर.
१६) सर्व मंत्रालयीन विभाग.
१७) सर्व कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.